**वेतनेत्तर बाबींकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील माहे जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ या तीन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ -२०२२/प्र.क्र. ४१/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :- २९ मार्च, २०२३.

**वाचा:-**

(१) शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ-२०२१/ प्र.क्र.३५/का ९, दि.२९.०३.२०२२.
(२) शासन परिपत्रक, वित्त् विभाग क्र. अर्थसं- २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल.२०२२.
(३) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. राअआ/२०२२/प्र.क्र.४१/ का-९, दि.२३ मे, २०२२.
(४) शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ-२०२२/ प्र.क्र.४१/का ९, दि.२५ ऑगस्ट ,२०२२
(५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ-२०२२/प्र.क्र.४१/का-९, दि.१६ फेब्रुवारी.२०२३,
(६) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र. राअआ/लेखा/ प्र.क्र.०७/का-४/२०२२-२३, दि. ०१, फेब्रुवारी, २०२३ चे पत्र व सहपत्रे.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास कार्यालयीन खर्चाकरिता संदर्भ क्र. २ मधील वित्त विभागाच्या मार्गदर्शक सुचनानुसार सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात, संदर्भ क्र. ४ दि. २५ ऑगस्ट, २०२२ च्या शासन निर्णयान्वये माहे ऑक्टोबर, २०२३ ते डिसेंबर, २०२३ या तीन महिनांच्या कालावधीकरिता रु.६,५२,२५०/- एवढे अनुदान वितरीत करण्यात आलेले आहे. तर संदर्भ क्र.५ दि.१६ फेब्रुवारी, २०२३ अन्वये अल्पसंख्याक आयोगाच्या कार्यालयीन खर्चाकरिता माहे ऑक्टोबर २०२२ ते डिसेबर, २०२२ च्या कालावधीकरिता आयोगाने केलेल्या मागणीपैकी रु.८,०९,००/- वेतनेत्तर अनुदान वितरीत करण्यात आलेले आहे. आता आयोगाच्या कार्यालयीन खर्चाकरीता माहे जानेवारी ते मार्च या कालावधीकरीता उर्वरित वेतनेत्तर अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१)(१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत एकुण रु.४१,७५,०००/- (अक्षरी रुपये एकेचाळीस लाख पंच्याहत्त्र हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. संदर्भ क्र. २ मधील वित्त विभाग शासन परिपत्रक दि. ४.०४.२०२२ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ६०% मर्यादेत डिसेंबर , २०२२ पर्यंत अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच प्रती महिना ७ % वेतनेत्तर अनुदान वितरित करण्यात येत आहे. त्यानुसार वित्त् विभागाने उपलब्ध करुन दिल्यानुसार अर्थसंकल्पित अनुदानापैकी १४ % च्या प्रमाणात रु. ६,५२,२५०/- एवढे वेतनेतर अनुदान संदर्भ क्र. ४ दि.२५ ऑगस्ट, २०२२ च्या शासन निर्णयान्वये माहे जुलै २०२२ ते सप्टेंबर २०२२ या तीन महिन्याच्या कालावधीकरिता महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यात आलेला आहे. आता आयोगाने माहे ऑक्टोंबर २०२२ ते मार्च २०२३ या सहा महिनाच्या कालावधीकरीता रु.१५,४२,५९६/- एवढे अनुदान उपलब्ध् करुन वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार शासन निर्णय दि.१६ फेब्रुवारी,२०२३ अन्वये विभागाच्या बिम्स प्रणालीवर उपलब्ध असलेले रु.८,०९,०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता वित्त विभागाने आयोगाने मागणी केलेल्या रु.१५,४२,५९६/- निधी पैकी रु.८,०९,०००/- वजा जाता उर्वरित रु.६,५६,४०४/- एवढा निधी वितरीत करण्यासाठी उपलब्ध करून दिला आहे. त्यानुसार वित्त विभागाने अल्पसंख्याक विकास विभागास उपलब्ध करून दिलेला रु.६,५६,४०४/- (अक्षरी रुपये सहा लक्ष छप्पन हजार चारशे चार फक्त) एवढे वेतनेत्तर अनुदान कार्यालयीन खर्चाकरिता महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरीत करण्यात येत आहे.

३. त्यानुसार माहे जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ या कालावधीकरीता रु.६,५६,४०४/- इतके अनुदान (लेखाशिर्ष २२३५ ए २४९, ३१ सहायक अनुदान ) वेतनेतर या उद्दिष्टाखाली खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई याच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिलवार लेखाशिर्ष | सन २०२२-२३ साठी अर्थसंकल्पिय अनुदान (रु.) | सन २०२२-२३ मधील वितरीत अनुदान माहे एप्रिल, २०२२ ते माहे मार्च-२०२३ अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ४९%) (रु.) | सन २०२२-२३ मधील मंजूर अनुदान माहे जानेवारी,२०२३ते माहे मार्च २०२३) (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४१,७५,०००/- | २०,४५,७५०/- | ६,५६,४०४/- |
| | **एकुण** | **४१,७५,०००/-** | २०,४५,७५०/- | ६,५६,४०४/- |
| **( अक्षरी एकुण रुपये सहा लाख छप्पन हजार चारशे चार फक्त )** | | | | |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२२-२३ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहिल याची दक्षता घेण्यात यावी. कोणत्याही प्रकारची खरेदी व दुरुस्ती करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाचे तंतोतंत पालन करावे. तसचे ज्या उद्दीष्टांकरीता निधी वितरीत करण्यात आले आहे, केवळ त्याकरिताच खर्च करण्यात यावे. या आदेशान्वये वितरीत करण्यात

आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशिल, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate शासनास वेळोवेळी सादर करणे बंधनकारक आहे. संदर्भ क्र. (२) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी "मागणी क्र.झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य) , ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. " सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग - २ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ४ एप्रिल, २०२२ मधील अटी शर्तीची पुर्तता होत असुन, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८०/२०२३/व्यय-१ दि.२३.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१४१५०९४११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba771 08c21a289d50d4b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47644BA707F1CC419E5362269A74B7B1EC6AB4F745 648DEF2597546D88711BB4, cn=SARANGKUMAR VASANTRAO PATIL
Date: 2023.03.29 14:24:48 +05'30'

**(सारंगकुमार पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२.महालेखापाल-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५.अवर सचिव, ( व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
६.कक्ष अधिकारी, का-७ , अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.